**आस्थापना मंडळासमोर सादर करावयाच्या**
**<u>प्रस्तावाबाबत...</u>**
**पदोन्नतीसाठी गोपनीय अहवालांचे निकष.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सीएफआर १२१७/प्र.क्र. ३६/का.१३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १ एप्रिल, २०१७

**<u>वाचा</u> :** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : ईएसबी १११४/प्र.क्र. २०५/का.१३, दि. ०१ मार्च, २०१७.

**<u>प्रस्तावना :-</u>**

आस्थापना मंडळासमोर सादर करावयाच्या प्रस्तावाबाबत सुधारित निकष निश्चित करण्याबाबतच्या दि. ०१.०३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये आस्थापना मंडळ क्र. १ तसेच २ च्या कार्यकक्षेतील पदांवर, पदोन्नती देण्यासाठी गोपनीय अहवालाच्या प्रतवारीचा निकष किमान "अ(उत्कृष्ट)" असा विहीत करण्यात आला आहे. सदर शासन निर्णय अस्तित्वात येण्यापूर्वी आस्थापना मंडळ क्र. २ च्या कार्यकक्षेत येणाऱ्या पदांवरील पदोन्नतीसाठी गोपनीय अहवालाच्या प्रतवारीचा निकष "ब+(निश्चित चांगला)" असा विहीत होता. तो सुधारित करण्यात आल्यामुळे निम्न संवर्गातील पदावर लिहिण्यात आलेला "ब+(निश्चित चांगला)" हा गोपनीय अहवाल पदोन्नतीच्या आड येणारा ठरणार आहे. ही बाब पूर्वीच्या निकषानुसार मागील ५ वर्षाची "ब+(निश्चित चांगला)" अशी प्रतवारी धारण करणाऱ्या अधिकाऱ्यांवर अन्यायकारक ठरू नये याकरिता तरतूद करणे आवश्यक आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

त्यानुसार शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, आस्थापना मंडळ क्र. २ च्या कार्यकक्षेतील ज्या पदावर पदोन्नतीसाठी दि. ०१.०३.२०१७ पूर्वी विहीत केलेले सरासरी गोपनीय अहवालांचे निकष "ब+(निश्चित चांगला)" होते, त्या पदावर पदोन्नतीसाठी विचारात घ्यावयाच्या सन २०१५-१६ आणि त्यापूर्वीच्या गोपनीय अहवालाची सरासरी प्रतवारी किमान "ब+ (निश्चित चांगला)" आणि सन २०१६-१७ आणि त्यानंतरच्या गोपनीय अहवालांची सरासरी प्रतवारी "अ (उत्कृष्ट)" आवश्यक राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०१११३०५५८८०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Khalid B Arab

Digitally signed by Khalid B Arab
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=17b1bdae334a3efab8ffa330885658eb14b09969ecbab94b7f20dfd8f09f568b, cn=Khalid B Arab
Date: 2017.04.01 11:34:08 +05'30'

**(खालिद बी. अरब)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव.
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
५. सर्व मंत्रालयीन विभागाच्या सर्व आस्थापना शाखा.
६. उप सचिव (का.१३), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. निवडनस्ती/कार्यासन १३.